कारागृह महानिरीक्षक,

महाराष्ट्र राज्य, पुणे.

क्रमांक- एमआयएस-०१९६/१००१ /पीआरएस-२, गृहविभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक- १८ फेब्रुवारी १९९७.

विषय :- नाशिकरोड मध्यवर्ती कारागृहाच्या धर्तीवर इतर कारागृहात व तुरुंग अधिकारी प्रशिक्षण महाविद्यालय येरवडा, पुणे-६ येथे विपश्यना केंद्र सुरु करण्याबाबत...

संदर्भ:- आपले क्र. विपश्यना शिबीर/१९९६/कक्ष-५[३] पुणे-१ दिनांक २७.१.९७ चे पत्र.

उपरोक्त विषयासंदर्भात आपणास कळविण्यात येते की, येरवडा मध्यवर्ती कारागृह येथे फेब्रुवारी १९९७ च्या अखेरीस प्रायोगिक तत्वावर विपश्यना ध्यान शिबीर आयोजित करण्यास, व त्या शिबिरासाठी आवश्यक आणाव्या लागणाऱ्या वस्तूंची खरेदी करण्यास लागणारा रुपये ३५,०००/- [रुपये पस्तीस हजार] इतकी रक्कम कैदी कल्याण निधीतून खर्च करण्यास शासन मान्यता देत आहे.

२. वरीलप्रमाणे अन्य कारागृहात शिबिर आयोजित करण्याचा प्रस्ताव येरवडा मध्यवर्ती कारागृहामधील प्रायोगिक तत्वावरील शिबिराच्या अनुभवाच्या आधारे शासनास स्वतंत्रपणे सादर करावा. तसेच अशासकीय संस्थांकडून आर्थिक अथवा वस्तूंच्या स्वरूपातील मदत स्वीकारण्यापूर्वी शासन मान्यता घेण्यासाठी त्याबाबतचे प्रस्ताव सुस्पष्ट शासनास सादर करावे.

[ वि. म. कांबळी ]

कक्ष अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

प्रत,

कारागृह उपमहानिरीक्षक, पश्चिम विभाग, पुणे.

अधीक्षक येरवडा मध्यवर्ती कारागृह पुणे.

जिल्हा कोषागार अधिकारी पुणे.

महालेखापाल महाराष्ट्र [लेखा व अनुज्ञेयता] मुंबई.

महालेखापाल-१, महाराष्ट्र [लेखा व परीक्षा ]मुंबई.

वित्त विभाग [व्यय-८]

निवड नस्ती, पीआरएस-२.